कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील उप आयुक्त, गट-अ, सहायक आयुक्त,गट-अ आणि कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या संवर्गातील उमेदवारांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण (सीपीटीपी-५ व ६) मधील अधिकाऱ्यांच्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत....

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग

**शासन निर्णय क्रमांक :कौविउ-२०२०/प्र.क्र.१४/प्रशा.२ (रोजगार)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगूरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ:-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६
३. सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक : टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दिनांक २५.०९.२०१९
४. सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक : टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दिनांक ३१.१०.२०१९
५. कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१९ / प्र.क्र.०६ /२०२०/प्रशा.२, दिनांक ३० जानेवारी, २०२०

**शासन निर्णय :-**

सहायक आयुक्त, गट-अ व कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-१०१७ व राज्यसेवा परीक्षा-२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-५ व ६ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या ५ उमेदवारांसाठी दिनांक ३० जानेवारी, २०२० च्या शासन निर्णयाव्दारे ५ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत.

२. तथापि, सीपीटीपी-५ व ६ मधील सहायक आयुक्त, गट-अ व कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, गट-ब च्या प्रशिक्षणार्थी अधिकाऱ्यांचा सत्र ३ व सत्र ४ च्या परीक्षेच्या निकाल अद्याप जाहीर झालेला नाही. सदर निकाल जाहीर होऊन सबंधित प्रशिक्षणार्थीची सेवाज्येष्ठता निश्चित करण्यासाठी काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. तसेच सद्य:स्थितीत सदर पदाचे विभागीय संवर्ग वाटप अद्याप झालेले नसून, या सर्व बाबींस काही कालावधी लागण्याची शक्यता असल्याने सदर परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या ५ अधिसंख्य पदांना नियमित पदस्थापने पर्यन्त मुदतवाढ देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. सहायक आयुक्त, गट-अ व कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या संवर्गातील सदर ५ अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाऱ्यानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११०२९१४५९१३५७०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Maharashtra State Skill Development Society, ou=eOffice, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2021.10.29 15:00:29 +05'30'

**( संतोष रोकडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई
४. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे
५. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपुर-४४२४१०
६. उपआयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागीय आयुक्तालय,(सर्व)
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार कार्यालय,पुणे/नागपूर
९. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई